**सातव्या वेतन आयोगामध्ये तीन लाभांच्या सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा पहिला लाभ मंजूर करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**सामान्य प्रशासन विभाग,**

**शासन आदेश क्र. मावज-२०२४/१८५ /प्र.क्र. ६६/मावज-२**

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,

दिनांक : २८ मे, २०२४.

**संदर्भ :-** १) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. वेतन १९९९/प्र.क्र.२/सेवा.३, दि. २०.७.२००१

२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. वेतन ११०९/प्र.क्र.४४/सेवा.३, दि. १.४.२०१०

३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. वेतन १११९/प्र.क्र.३/सेवा.३, दि. २.३.२०१९

**शासन आदेश :**

वित्त विभागाच्या संदर्भ क्र. ३ येथील दिनांक २.३.२०१९ च्या शासन निर्णयान्वये १०, २० व ३० वर्षाच्या नियमित सेवेनंतरची, तीन लाभांची सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना ही दिनांक १.१.२०१६ पासून लागू करण्यात आली आहे. वित्त विभागाच्या दिनांक २.३.२०१९ च्या शासन निर्णयान्वये अधिकाऱ्यांना १०, २०, व ३० वर्षाच्या नियमित सेवेनंतर पहिला, दुसरा व तिसरा लाभ अनुज्ञेय करण्याची तरतूद आहे.

२. उपरोक्त तरतूदीनुसार सामान्य प्रशासन विभागाच्या अधिनस्त असलेल्या माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील आश्वासित प्रगती योजनेंतर्गत त्यात नमूद केलेल्या अटी व शर्तींची पूर्तता करणाऱ्या **"वरिष्ठ सहायक संचालक (माहिती) / जिल्हा माहिती अधिकारी / वरिष्ठ उपसंपादक (माहिती) / जनसंपर्क अधिकारी गट -अ (कनिष्ठ),"** संवर्गातील तसेच **"सहायक संचालक (माहिती) / माहिती अधिकारी / अधिपरिक्षक, पुस्तके व प्रकाशने गट-ब"** संवर्गातील सोबतच्या यादीत परिशिष्ट-अ व परिशिष्ट-ब मध्ये नमूद केलेल्या अधिकाऱ्यांना तीन लाभांच्या सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेंतर्गत लाभ मंजूर करण्यात येत आहे. परिशिष्ट- अ मधील अधिकाऱ्यांना गट-अ (वरिष्ठ) एस २३: ६७७००-२०८७०० ही वेतनश्रेणी मंजूर करण्यात येत आहे. तसेच परिशिष्ट-ब मधील अधिकाऱ्यांना गट-अ (कनिष्ठ) एस २० : ५६१००-१७७५०० ही वेतनश्रेणी मंजूर करण्यात येत आहे.

३. परिशिष्ट- अ मधील श्री. युवराज पाटील, श्री. अजय जाधव व परिशिष्ट- ब मधील श्री. रविंद्र ठाकूर या अधिकाऱ्यांची ५०/५५ पुनर्विलोकनाची कार्यवाही झालेली नाही. मा. अध्यक्ष, विभागीय पदोन्नती समिती यांच्या निदेशानुसार ५०/५५ पुनर्विलोकनाच्या अधीन राहून उपरोक्त अधिकाऱ्यांना सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा लाभ देण्यात येत आहे.

४. तीन लाभांच्या सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेच्या लाभामुळे लाभ मंजूर करण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांच्या जबाबदारी आणि कर्तव्यात वाढ होत नसली तरी नियमित पदोन्नतीप्रमाणे त्यांना वरिष्ठ पदाच्या वेतनश्रेणीत वेतननिश्चतीचा लाभ देण्यात येत असल्याने सदर वेतनश्रेणीत त्यांना भविष्यात नियमित ( कार्यात्मक ) पदोन्नती मिळाल्यावर पुन्हा: वेतननिश्चितीचा लाभ देय होणार नाही.

५. सदर कर्मचाऱ्यांचे नाव कनिष्ठ (मूळ) संवर्गाच्या ज्येष्ठता सूचीत राहील आणि सेवा प्रवेश नियमातील तरतूदीनुसार उपलब्ध रिक्त पदावर योग्य वेळी नियमित पदोन्नतीसाठी त्यांच्या नावांचा विचार करण्यात येईल. सदर लाभ मंजूर केल्यानंतर कर्मचाऱ्याने नियमित पदोन्नती नाकारल्यास अथवा पदोन्नतीसाठी अपात्र ठरल्यास या योजनेअंतर्गत दिलेला उपरोक्त पदोन्नतीचा लाभ त्याला मिळणार नाही व त्यास त्याच्या मूळच्या पदावर पदावनत करण्यात येईल.

६. सदर कर्मचाऱ्यांना त्यांना वर नमूद केलेल्या अटी मान्य असल्याचे बंधपत्र सादर करावे. तसेच या आदेशाच्या अनुषंगाने वरिष्ठ वेतनश्रेणीमध्ये वेतननिश्चिती करण्यासाठी संबंधित कर्मचाऱ्यांनी सदर आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत विकल्प द्यावा, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय यांनी अधिकाऱ्यांच्या पदोन्नतीच्या पदाच्या वेतन संरचनेतील वेतन निश्चिती त्यांनी दिलेल्या विकल्पानुसार करुन त्यांना या योजनेचा लाभ त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या दिनांक व वेतन संरचनेनुसार देण्यात यावा.

७. हा शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक सांकेतांक क्र. २०२४०५२८१५४४५६९८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIJAY MAROTRAO NANDEKAR

Digitally signed by VIJAY MAROTRAO NANDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=1b335601da651693303a45db809973b127e2048acba707f3af981bf515548266, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=62861E2C588076DA807403FE9012F19FCC79CFD621047A784178829F75A0C6F2, cn=VIJAY MAROTRAO NANDEKAR
Date: 2024.05.28 15:57:51 +05'30'

**( विजय नांदेकर )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**सोबत : परिशिष्ट -"अ" व "ब"**

**प्रति,**

१. प्रधान सचिव (मा.व ज.), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
३. उप सचिव, सामान्य प्रशासन विभा, मंत्रालय, मुंबई-३२
४. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व परिक्षा), मुंबई / नागपूर,
६. संचालक (माहिती) (प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
७. संचालक (माहिती) (वृत्त व जनसंपर्क), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
८. संचालक (माहिती), नागपूर-अमरावती विभाग, नागपूर,
९. संचालक (माहिती), मराठवाडा विभाग, छत्रपती संभाजीनगर,
१०.उप संचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
११.अधिपरिक्षक, पुस्तके व प्रकाशने, मुंबई,
१२.संबंधित अधिकारी (मावज मार्फत),
१३.सर्व जिल्हा माहिती कार्यालये,
१४.सर्व जिल्हा कोषागार कार्यालये,
१५.निवडनस्ती.

## परिशिष्ट - "अ"

**सामान्य प्रशासन विभाग, आदेश क्रमांक : मावज-२०२४/१८५ /प्र.क्र. ६६ /मावज-२, दिनांक :- २८ / ५ / २०२४ चे जोडपत्र.**

**वरिष्ठ सहायक संचालक (माहिती) / जिल्हा माहिती अधिकारी /वरिष्ठ उपसंपादक (माहिती) / जनसंपर्क अधिकारी, गट -अ (कनिष्ठ), एस २० : ५६१००-१७७५०० पदावर नियमित सेवेनंतर सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेंतर्गत आश्वासित प्रगती योजनेंतर्गत उपसंचालक (माहिती), गट -अ एस २३ : ६७७००-२०८७०० पदाची वरिष्ठ वेतनश्रेणी देण्यासाठी पात्र ठरलेले अधिकारी.**

| अ.क्र | नाव | ज्या पदावरुन लाभ अनुज्ञेय करावयाचा आहे ते पद व वेतनश्रेणी | ज्या पदाची वरिष्ठ वेतनश्रेणी लागू करावयाची आहे ते पद व वेतनश्रेणी | वरिष्ठ वेतनश्रेणी लागू करावयाचा दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | श्री. जगदीश त्र्यं. मोरे | वरिष्ठ सहायक संचालक (माहिती) एस २० : ५६१००-१७७५०० | उपसंचालक (माहिती), एस २३ : ६७७००-२०८७०० | १३.०६.२०२३ |
| २ | श्री. मनोज शि. सानप | वरिष्ठ सहायक संचालक (माहिती) एस २० : ५६१००-१७७५०० | उपसंचालक (माहिती), एस २३ : ६७७००-२०८७०० | १३.०६.२०२३ |
| ३. | श्री. युवराज वि. पाटील | वरिष्ठ सहायक संचालक (माहिती) एस २० : ५६१००-१७७५०० | उपसंचालक (माहिती), एस २३ : ६७७००-२०८७०० | २८.०६.२०२३ |
| ४ | श्री. अजय. ज. जाधव | वरिष्ठ सहायक संचालक(माहिती) एस २० : ५६१००-१७७५०० | उपसंचालक (माहिती), एस २३ : ६७७००-२०८७०० | १५.०६.२०२३ |
| ५ | श्री. सुनील अ. सोनटक्के | वरिष्ठ सहायक संचालक(माहिती) एस २० : ५६१००-१७७५०० | उपसंचालक (माहिती), एस २३ : ६७७००-२०८७०० | २०.०६.२०२३ |

## परिशिष्ट - "ब"

**सामान्य प्रशासन विभाग, आदेश क्रमांक : मावज-२०२४/१८५ /प्र.क्र. ६६ /मावज-२, दिनांक :- २८/ ५ / २०२४ चे जोडपत्र.**

**सहायक संचालक (माहिती) / माहिती अधिकारी, गट -ब , एस १७ : ४६६००-१५११०० पदावर नियमित सेवेनंतर सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेंतर्गत आश्वासित प्रगती योजनेंतर्गत वरिष्ठ सहायक संचालक (माहिती), गट-अ, एस २० : ५६१००-१७७५०० पदाची वरिष्ठ वेतनश्रेणी देण्यासाठी पात्र अधिकारी.**

| अ.क्र | नाव | ज्या पदावरुन लाभ अनुज्ञेय करावयाचा आहे ते पद व वेतनश्रेणी | ज्या पदाची वरिष्ठ वेतनश्रेणी लागू करावयाची आहे ते पद व वेतनश्रेणी | वरिष्ठ वेतनश्रेणी लागू करावयाचा दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | श्री. रविंद्र दे ठाकूर | सहायक संचालक (माहिती) एस १७ : ४६६००-१५११०० | वरिष्ठ सहायक संचालक(माहिती) एस २० : ५६१००-१७७५०० | १०.०५.२०१७ |